20110208145229001

राज्यातील नगरपरिषद कर्मचा-यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशी प्रमाणे वेतनश्रेण्या लागू करण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग,**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/प्र.क्र. १०६/०९/नवि-१४.**

**मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.**

**दिनांक : ३१ ऑगस्ट,२००९.**

**प्रस्तावना :** राज्यातील शासकिय कर्मचा-यांच्या धर्तीवर सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेण्या लागू कराव्यात अशी मागणी नगरपरिषद कर्मचाऱ्याकडून होत होती. त्यानुषंगाने राज्यातील नगरपरिषद कर्मचा-यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीप्रमाणे सुधारित वेतनश्रेण्या लागू करण्याबाबत नगरपरिषदांना मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. वरील परिस्थितीबाबत सांगोपांग विचार करुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय : -**

राज्यातील "अ","ब" व "क" वर्ग नगरपरिषदांनी त्यांच्या कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीप्रमाणे वेतनश्रेण्या लागू करण्यांस खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

(अ) ज्या नगरपरिषदा सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीप्रमाणे वेतनश्रेण्या आपल्या कर्मचा-यांना लागू करु इच्छितात त्या नगरपरिषदांनी खालील सुधार कार्यक्रम राबविणे बंधनकारक राहील व यासंबंधी त्यांचा स्वीकृतीदर्शक ठराव संबंधित नगरपरिषदेने पारित करुन संबंधित जिल्हाधिकारी यांच्या मार्फत संचालक नगरपालिका प्रशासन यांना सादर करणे अनिवार्य राहील.

(i) महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ मधील कलम १२४ नुसार सर्व नगरपरिषदांनी करपात्र मुल्यांमध्ये दर चार वर्षानी सुधारणा करणे बंधनकारक राहील.

(ii) नगरपरिषद क्षेत्रातील सर्व मालमत्तांवर मालमत्ता कराची आकारणी करणे व कोणतीही मालमत्ता, मालमत्ता कराचे आकारणीशिवाय रहाणार नाही याची दक्षता घेणे अनिवार्य राहिल.

(iii) नगरपरिषदांनी सर्व करांची वसुली चालू मागणीच्या किमान ९०% पर्यंत करणे तसेच थकबाकी चालू मागणीच्या १०% पेक्षा जास्त रहाणार नाही याची दक्षता घेणे नगरपरिषदेवर बंधनकारक राहील.

(iv) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ मधील तरतुदीप्रमाणे सर्व नगरपरिषदांनी त्यांच्या शहरात लावण्यात येत असलेल्या विकास शुल्कामध्ये नगरपरिषदेचे उत्पन्न वाढावे म्हणून शासनाच्या मान्यतेने नियतकालिक वाढ करणे हे सर्व नगरपरिषदांवर बंधनकारक राहील.

(v) नगरपरिषदा देत असलेल्या नागरी सुविधांबद्दल योग्य त्या दराने उपभोक्ता आकाराची **(user charges)** आकारणी होईल, याची दक्षता नगरपरिषदांना घ्यावी लागेल, जेणेकरुन सदर नागरी सुविधा स्वबळावर सुरळीत चालू राहतील.

(vi) नगरपरिषदांनी आर्थिक स्थिती सुदृढ करण्यासाठी अनावश्यक खर्च टाळून काटकसरीचे धोरण अवलंबिणे आवश्यक राहील.

(vii) पाणी लेखा परीक्षण **(Water Audit)**, ऊर्जा लेखा परीक्षण **(Energy Audit)** करुन घेवून पाण्याची गळती थांबून वीज देयकांच्या खर्चात घट आणण्यासाठी प्रयत्न करणे अनिवार्य राहील.

(viii) नगरपरिषद हद्दीत पिण्याच्या पाण्याचा गैरवापर होवू नये व पुरविण्यात येणा-या सर्व पाण्याची पाणीपट्टी वसुल व्हावी म्हणून नगरपरिषदांनी पाणी मापक यंत्र **(Water Meter)** बसविण्याची कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

(ix) सर्व नगरपरिषद कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबींमध्ये एकसुत्रीपणा राहावा म्हणून शासन स्तरावरुन शासन विहित करील अश्या आदर्श सेवा प्रवेश नियमांची अंमलबजावणी प्रत्येक नगरपरिषदेने करणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

(x) या व्यतिरिक्त लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधा विकास कार्यक्रम **(UIDSSMT)**, एकात्मिक गृहनिर्माण झोपडपट्टी विकास योजना **(IHSDP)** व कमी खर्चाची स्वच्छता योजना **(ILCS)** अशा विविध केंद्र शासनाच्या योजनांतर्गत

विहित करण्यात आलेल्या सर्व सुधारणा (**Reforms**) लागू करणे नगरपरिषदांवर बंधनकारक राहील.

**(ब)** राज्यातील नगरपरिषदांना दिनांक १/१/२००६ पासून किंवा नगरपरिषदा ठरावान्वये ठरवितील त्या नंतरच्या दिनांकापासून सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीप्रमाणे सुधारित वेतनश्रेण्या लागू करता येतील. त्या लागू करतांना नगरपरिषदांनी वर परिच्छेद (अ) मध्ये नमूद केल्याप्रमाणे ठराव करुन याबाबतच्या प्रस्तावास संबंधित जिल्हाधिकारी यांची मान्यता घ्यावी. मात्र सहावा वेतन आयोग लागू केल्यास कर्मचाऱ्यांना देय ठरणारा थकबाकीचा पूर्ण खर्च संबंधीत नगरपरिषदांना स्वनिधीतून सोसावा लागेल. त्यासाठी शासनाकडून कोणतेही अनुदान मिळणार नाही.

सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीप्रमाणे सुधारित वेतनश्रेणी निश्चित करण्यामध्ये काही अडचण असल्यास (जसे संबंधित वेतनश्रेणी नसल्यास अथवा नगरपरिषदेने शिफारस केलेली वेतनश्रेणी सिध्दगणकातील समान श्रेणीपेक्षा भिन्न असल्यास किंवा कर्मचा-यांच्या तक्रारी/वाद किंवा तत्सम काही बाबी आढळल्यास) त्याबाबत आयुक्त तथा संचालक,नगरपालिका प्रशासन संचालनालय,मुंबई यांची मान्यता घेण्यात यावी.

**(क)** फक्त सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीप्रमाणे वेतनश्रेण्या लागू करण्याच्या प्रयोजनार्थ नगरपरिषदांना आस्थापना खर्चाची मर्यादा लागू राहणार नाही.

**(ड)** नगरपरिषदांनी त्यांच्या कर्मचा-यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीप्रमाणे वेतनश्रेण्या लागू करण्याचा निर्णय घेतल्यामुळे निर्माण होणारा अतिरिक्त आर्थिक बोजा सोसण्याकरिता शासनाकडून कोणतेही वेगळे अनुदान देण्यात येणार नाही.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५४/०९/व्यय-३ दि.३१/०७/२००९ अन्वये प्राप्त अभिप्रायांचा विचार करुन निर्गमित करण्यांत येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

३१/८/२००९

(मनु कुमार श्रीवास्तव)
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०००३२
२) मा.राज्यमंत्री (नवि) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई - ४०००३२

३) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०००३२

४) मा.प्रधान सचिव ,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

५) आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई-४०० ०३०.

६) सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय. कोकण/नाशिक/पुणे/अमरावती/औरंगाबाद/नागपूर.

७) सर्व जिल्हाधिकारी.

८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई

९) निवासी लेखा अधिकारी,मुंबई.

१०) महालेखापाल महाराष्ट्र-१ मुंबई

११)महालेखापाल महाराष्ट्र-२ नागपूर.

१२) सर्व मुख्याधिकारी - नगरपरिषद

१३) सचिव (नवि) यांचे स्टाफ ऑफिसर,मंत्रालय,मुंबई-३२.

१४) सह सचिव (नवि-१४),न.वि.वि. यांचे स्वीय सहायक

१५) कक्ष अधिकारी, नवि- ४,१७, १८, १९, २३,३१ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१६) निवडनस्ती /नवि-१४.

---------